कोल्हापूर  जिल्ह्यातील करवीर आणि शिरोळ या तालुक्याच्या ठिकाणी कॅन्सर रजिस्ट्री स्थापना करणे व प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य ) यांचे अध्यक्षतेखाली सुकाणू समिती गठीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः समिती-२०१८/प्र.क्र.३७८/आरोग्य-३ अ

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: ०५ डिसेंबर, २०१८

वाचा : -

१) सह संचालक (असंसर्गजन्य रोग) यांचे पत्र क्र जा.क्र.संआसे/NDC/नं.क्र.३३९/Cancer Registry/१६०९-१६/१८ दि.२७/०४/२०१८.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन पत्र क्र.बैठक-२०१८/प्र.क्र.३५७/आ-३ अ, दि.१२/०९/२१८. (मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०१/०९/२०१८ रोजीचे इतिवृत्त.)

प्रस्तावना :-

कर्करोगाने बाधीत रुग्णांवर उपचार होण्याच्या दृष्टीने मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण यांनी सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात  कोल्हापूर जिल्ह्यातील शिरोळ,कागल, हातकलंगले,करवीर या चार तालुक्यामध्ये  कॅन्सर रजिस्ट्री स्थापन करण्याचे आश्वासन दिले आहे. तसेच मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०१/०९/२०१८ रोजी झालेल्या बैठकीतील निदेशानूसार सह संचालक  (अससर्गजन्य रोग) आरोग्य सेवा, यांनी उपरोक्त पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने टाटा मेमोरियल हॉस्पिटल, मुंबई यांच्या सहकार्याने कॅन्सर रजिस्ट्रीची स्थापना करणे व याकरीता मा.प्रधान सचिव (सा.आ.) यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.  याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

कर्करोगावरील प्रभावी उपचार व निदान करण्यासाठी टाटा मेमोरीयल हॉस्पिटल मुंबई येथील तज्ञ डॉक्टरांच्या सहकार्याने कर्करोग रुग्णांना उत्तम औषधोपचार/ उपाय योजना करण्यासाठी कोल्हापूर जिल्ह्यातील करवीर आणि शिरोळ या तालुक्याच्या ठिकाणी कॅन्सर रजिस्ट्री स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. उपरोक्त कॅन्सर रजिस्ट्री कार्यान्वित करण्यासाठी खालीलप्रमाणे सूकाणू समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पद | समितीवरील नियुक्ती |
|---|---|---|
| १ | मा.प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) | अध्यक्ष |
| २ | आयुक्त तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | सदस्य |
| ३ | डॉ.राजेंद्र बडवे, संचालक, टाटा मेमोरियक हॉस्पिटल, मुंबई. | सदस्य |
| ४ | डॉ.आर.दिक्षित, प्राध्यापक तथा प्रमुख इपिडीथोमोलॉजी विभाग, टाटा मेमोरियल हॉस्पिटल, मुंबई. | सदस्य |
| ५ | डॉ.अतुल बुदुख, सहाय्यक प्राध्यापक, इपिडीथोमोलॉजी विभाग, टाटा मेमोरियल हॉस्पिटल, मुंबई. | सदस्य |
| ६ | जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर | सदस्य |
| ७ | कोल्हापूर येथे प्रचलित असणारे खाजगी वैद्यकीय व्यवसायिक. | सदस्य |
| ८ | डॉ. रेश्मा पवार, कार्यकारी संचालक, कोल्हापूर कॅन्सर सेंटर. | सदस्य |
| ९ | डॉ.साधना तायडे, सह संचालक, (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई. | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-.**

१) कर्करोगावरील प्रभावी उपचारा करीता टाटा मेमोरीयल हॉस्पिटल मुंबई येथील तज्ञ डॉक्टरांच्या सहकार्याने रुग्णांना उत्तम औषधोपचार/ उपाय योजना याबाबत सूचना करणे.

२) कर्करोग उपचाराबाबत देण्यात येणा-या सुविधा व उपचारा बाबत संनियत्रण करणे

३) विविध प्रकारच्या कर्करोगाचे निदान व त्या वरील औषधोपचाराकरीता उपाय योजना सूचीत करणे

४) कॅन्सर रजिस्ट्री कडून करण्यात येणा-या कार्यावर नियंत्रण ठेवल व मार्गदर्शन करेल.

५) सदर समिती दर ३ महिन्यांनी कॅन्सर रजिस्ट्रीच्या कामाचा आढावा घेईल.

६) सदर समितीस सर्व संबंधीत अधिका-यांची आवश्यकते नुसार बैठक बोलविण्यांची मुभा राहिल.

७) सदर समिती त्यांचा वार्षिक अहवाल शासनास सादर करेल.

कोल्हापूर जिल्हयातील करवीर आणि शिरोळ येथील कॅन्सर रजिस्ट्रीची स्थापना करण्याकरीता व कार्यन्वीत करण्यासाठी आवश्यक अनूदान उपलब्ध करण्यासाठी उपसंचालक आरोग्य सेवा कोल्हापूर यांनी जिल्हा नियोजन समितीकडे प्रस्ताव सादर करावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२८१७०८३५१२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.12.05 11:48:37 +05'30'

**(रा.शा.कौरते)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई.
३. सहसंचालक, (रुग्णालये राज्यस्तर) आरोग्य सेवा,संचालनालय,मुंबई
४. अति. संचालक (असंसर्गजन्य रोग) आरोग्य सेवा,संचालनालय,मुंबई
५. उपसंचालक, आरोग्य सेवा मुंबई मंडळ कोल्हापूर.
६. जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय, कोल्हापूर.
७. डॉ.राजेंद्र बडवे, संचालक, टाटा मेमोरियक हॉस्पिटल, मुंबई.

८. डॉ.आर.दिक्षित, प्राध्यापक तथा प्रमुख इपिडीथोमोलॉजी विभाग, टाटा मेमोरियल हॉस्पिटल, मुंबई.

९. डॉ.अतुल बुदुख, सहाय्यक प्राध्यापक, इपिडीथोमोलॉजी विभाग, टाटा मेमोरियल हॉस्पिटल, मुंबई.

१०.डॉ. रेश्मा पवार, कार्यकारी संचालक, कोल्हापूर कॅन्सर सेंटर.

११.अवर सचिव.(अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१२.निवड नस्ती (आरोग्य-३ अ)